अविभाजित ठाणे जिल्ह्यातील पुरवठा विभागाच्या गट-क व गट-ड च्या ४९ पदांचे ठाणे जिल्हा व पालघर जिल्ह्यांमध्ये वाटप करणे.

**महाराष्ट्र शासन**

**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**

**शासन आदेश क्रमांक - आस्थाप्र- २८१३/प्र.क्र. २८५/ना.पु.-१५**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

दिनांक : ९ ऑक्टोंबर, २०१५

**संदर्भ :- शासन आदेश क्रमांक - आस्थाप्र- २८१३/प्र.क्र. २८५/ना.पु.-१५, दि.२४ जून, २०१५**

**शासन आदेश :-**

शासनाचे संदर्भाधीन दिनांक २४ जून, २०१५ चे आदेश या आदेशान्वये रद्द करण्यात येत आहेत.

२. ठाणे व पालघर जिल्ह्यातील जिल्हा पुरवठा अधिकारी कार्यालयातील पदांबाबत प्रधान सचिव ( महसूल ) यांचे अध्यक्षतेखाली दिनांक १४ सप्टेंबर, २०१५ रोजी झालेल्या बैठकीत जिल्हाधिकारी, ठाणे व जिल्हाधिकारी, पालघर यांनी मान्य केल्यानुसार, अविभाजित ठाणे जिल्ह्यातील गट-क व गट-ड मधील ४९ पदांचे ठाणे आणि पालघर जिल्ह्यामध्ये खालीलप्रमाणे वाटप करण्यात येत आहे.

| अ.क्र. | पदे | विभाजनापूर्वीची मंजूर पदे | विभाजनानंतरची पदे | |
|---|---|---|---|---|
| | | | ठाणे | पालघर |
| १. | अव्वल कारकून ( गट-क ) | १७ | ८ | ९ |
| २. | लिपिक ( गट-क) | १४ | ५ | ९ |
| ३. | लघुटंकलेखक ( गट-क) | १ | ० | १ |
| ४. | जिल्हा लेखा पर्यवेक्षक ( गट -क) | ३ | १ | २ |
| ५. | शिपाई ( गट- ड) | ८ | ४ | ४ |
| ६. | सफाई कामगार ( गट-ड) | ६ | २ | ४ |
| **एकूण** | | **४९** | **२०** | **२९** |

३. जिल्हाधिकारी, ठाणे यांनी वरील पदांच्या वाटपास अनुसरुन पालघर जिल्हयासाठी वाटप केलेल्या २९ कर्मचा-यांना तात्काळ कार्यमुक्त करण्याची कार्यवाही करावी व त्याबाबतचा अहवाल शासनास सादर करावा.

४. जिल्हाधिकारी, ठाणे व जिल्हाधिकारी, पालघर यांनी वरील पदांचे वाटपाप्रमाणे पुढील कार्यवाही करावी.

५. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५१००९१७५७३१५५०६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

Uddhav Dattatrya Walunj

Digitally signed by Uddhav Dattatrya Walunj
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Uddhav Dattatrya Walunj
Date: 2015.10.09 17:59:44 +05'30'

**( उ. द. वाळुंज )**

शासनाचे उप सचिव

**प्रति,**

१) विभागीय आयुक्त, कोकण विभाग, नवी मुंबई
२) उप आयुक्त ( पुरवठा ) कोकण,
३) जिल्हाधिकारी, ठाणे
४) जिल्हाधिकारी, पालघर.
५) जिल्हा पुरवठा अधिकारी, ठाणे
६) जिल्हा पुरवठा अधिकारी, पालघर

**प्रत,**

१) महालेखापाल०१ ( लेखापरिक्षा/लेखा व अनुज्ञेयता/वाणिज्य लेखापरिक्षा ), मुंबई
२) जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे/पालघर
३) विभागातील सर्व उप सचिव/ अवर सचिव/ कक्ष अधिकारी
४) मा.मंत्री, ( अ.ना.पु. व ग्रा.सं.) यांचे खाजगी सचिव
५) मा.राज्यमंत्री, ( अ.ना.पु. व ग्रा.सं.) यांचे खाजगी सचिव
६) मा. सचिव, ( अ.ना.पु. व ग्रा.सं.) यांचे वरीष्ठ स्वीय सहायक
७) निवडनस्ती. (ना.पु.१५).